**राज्य शासन सेवेतील निरनिराळया वेतनश्रेणीतील पदांचे वर्गीकरण.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय,क्रमांकःएसआरव्ही-१०९८/१६४४/प्र.क्र.२/९९/बारा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २ जुलै,२००२.

वाचा - १] शासन निर्णय,सा.प्र.वि.एसआरव्ही- १०८८/प्र.क्र.१३/८८/बारा, दिनांक २९ जुलै,१९९३.
२] केंद्र शासनाचे कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे कार्यालयीन आदेश क्रमांक -१३०१२/१/९८/इएसटीटी [डी], दि.१२ जून,१९९८.

**शासन निर्णय**

चौथ्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने वेतनश्रेणीनुसार ज्याप्रमाणे पदांचे वर्गीकरण केले, त्या धर्तीवर राज्य शासनाने परिस्थितीनुरुप काही बदल करुन, राज्य शासन सेवेतील पदांचे वर्गीकरण उपरोल्लेखित दि.२९ जुलै,१९९३ च्या शासन निर्णयानुसार केले.

२. आता राज्य शासनाने पाचव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारीत वेतनश्रेणी मंजूर केल्या असल्याने, उपरोल्लेखित दि.२९ जुलै,१९९३ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन, राज्य शासन सेवेतील पदांचे सुधारीत वेतनश्रेणीनुसार खालीलप्रमाणे नव्याने वर्गीकरण करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचा तपशिल | पदांचे वर्गीकरण |
|---|---|---|
| १. | ज्या पदांचे वेतन किंवा पदाच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रु.११,५००/- पेक्षा कमी नाही, अशी पदे, | गट - अ |
| २. | ज्या पदांचे वेतन किंवा पदाच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रु.९,०००/- पेक्षा कमी नाही आणि रु.११,५००/- पेक्षा कमी आहे, अशी पदे, | गट - ब |
| ३. | ज्या पदांचे वेतन किंवा पदाच्या वेतनश्रेणीची कमालमर्यादा रु.४,४००/- पेक्षा कमी नाही आणि रु.९,०००/- पेक्षा कमी आहे, अशी पदे, | गट - क |
| ४. | ज्या पदांचे वेतन किंवा पदाच्या वेतनश्रेणीची कमालमर्यादा रु.४,४००/- पेक्षा कमी आहे, अशी पदे, | गट - ड |

३. अ) जुन्या वर्गीकरणानुसार ज्या पदांचा दर्जा "अराजपत्रित" समजला जातो, तोच दर्जा सुधारीत वर्गीकरणानंतरही कायम राहील. तसेच ज्या पदांना अगोदरच राजपत्रित दर्जा घोषित केला आहे, त्या पदांचा तो दर्जा यापुढेही कायम राहील. अराजपत्रित पदांना केवळ वेतनश्रेणीच्या आधारे किंवा विशिष्ट गटामधील समावेशनामुळे आपोआप राजपत्रित दर्जा प्राप्त होणार नाही.

ब) विद्यमान वर्गीकरणानुसार ज्या पदांकरीता मागासवर्गीयांचे आरक्षण लागू आहे त्या पदांचे सुधारीत वर्गीकरणानुसार गट बदलत असले तरी, त्या पदांना मुळ दर्जा कायम रहात असल्याने विद्यमान तरतुदीनुसार त्या पदांकरीता आरक्षण यापुढेही कायम राहील.

४. वरील नियमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी पदनिर्मितीच्या आदेशामध्ये ज्या पदांचा उल्लेख विवक्षितपणे गट-क (वर्ग-३) असा आहे व विद्यमान वर्गीकरणानुसार ती पदे गट-ड संवर्गामध्ये अंतर्भूत होत असतील, तर अशी

कृ.मा.प.

पदे गट-क संवर्गामध्ये असल्याचे मानण्यात यावे. संबंधित पदधारकांच्या बाबतीत गट-क प्रमाणे सध्याच्या सेवाशर्ती/सवलती लागू आहेत, त्यामध्ये बदल करण्यात येऊ नये.

५. विद्यमान गट - ड संवर्गामधील काही वेतनश्रेणीतील पदे, सुधारीत गट - क संवर्गामध्ये अंतर्भूत होतील, त्यामुळे त्यांच्या सेवाशर्ती व सवलतींमध्ये काही संदिग्धता निर्माण होण्याची शक्यता असल्यामुळे, विद्यमान वर्गीकरणाप्रमाणे जी पदे वेतनश्रेणीनुसार गट - ड ची समजली जात आहेत, ती पदे सुधारीत वर्गीकरणामुळे गट- क मध्ये अंतर्भूत होणार असली तरी, त्या वेतनश्रेणीतील पदधारकांच्या बाबतीत गट-ड प्रमाणे सध्या ज्या सेवाशर्ती/ सवलती लागू आहेत, त्यामध्ये बदल करण्यात येऊ नये.

६. राज्य शासन सेवेतील ज्या पदांना विद्यापीठ अनुदान आयोगाची वेतनश्रेणी लागू आहे त्या पदांना हे वर्गीकरणाचे आदेश लागू होणार नाहीत. अशा पदांबाबत संबंधित विभागांनी स्वतंत्रपणे निर्णय घ्यावेत.

७. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-११३०३/सेवा-१०, दिनांक २२ मे, २००० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्रकाश लोखंडे
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप-मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
मंत्रालयीन विभागाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
वित्त विभाग/सेवा-१०,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय,मुंबई,
* महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
* महालेखापाल-१ (लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन,नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अखत्यारितील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---

* पत्राने

* * * * *